**छत्रपती शिवाजी महाराज यांच्या ३५० व्या राज्यभिषेक सोहळयाकरिता टँकरने पाणी पुरवठा केलेल्या खर्चास सुधारित प्रशासकीय मान्यता देऊन निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०२३/प्र.क्र. ६४/पापु-१४**
जी. टी. रुग्णालय संकुल, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
दिनांक : ०६ मे, २०२४

<u>वाचा :-</u>

१) शासन निर्णय, **पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग** क्रमांकः टंचाई २०२३/प्र.क्र. ६४/पापु-१४, दिनांक २६ मार्च, २०२४.

२) जिल्हाधिकारी, रायगड यांचे क्रमांक : राजिप/ ग्रापापुवि/प्रशा-५/२९४७ /२०२४, दिनांक ०२.०५.२०२४

<u>प्रस्तावना:-</u>

" छत्रपती शिवाजी महाराज यांच्या ३५० व्या राज्यभिषेक सोहळयाकरिता किल्ले रायगड व पाचाड येथे टँकरने पाणी पुरवठा करण्यासाठी उपर्निर्दिष्ट क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये एकूण रु. ४६,६७,४९०/- इतक्या खर्चास सुधारित प्रशासकीय मान्यता देऊन निधी वितरीत केला आहे. परंतु, जिल्हाधिकारी, रायगड यांनी संदर्भाधीन पत्रान्वये जी.पी.एस. प्रणालीचा वापर करण्यात आलेला नसल्यामुळे सदर अट वगळण्याची विनंती केली आहे. त्यास अनुसरुन खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय</u>** :- उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये, छत्रपती शिवाजी महाराज यांच्या ३५० व्या राज्यभिषेक सोहळयाकरिता किल्ले रायगड व पाचाड येथे टँकरने पाणी पुरवठा करण्यासाठी रु. ४६,६७,४९०/- इतक्या रक्कमेस अटी व शर्तीच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयातील अट क्रमांक-**०३ - "सदर वित्तीय मान्यता देऊन शासन निर्णयानुसार**

**टँकरद्वारे/पिण्याच्या पाणी पुरवठा करण्यासाठीच्या उपाययोजनांकरीता जो निधी वितरीत करण्यात आला आहे, त्यामधून देयके अदा करताना खाजगी टँकरवर जी.पी.एस. प्रणाली बसविलेली असेल व जी.पी.एस.प्रणालीवर ज्या टँकरच्या फे-यांची नोंद होईल त्याच फेऱ्या देयकाकरिता अनुज्ञेय राहतील. पाणी पुरवठा करणा-या ज्या टँकरवर जी.पी.एस.प्रणाली बसविलेली नाही किंवा जी.पी.एस.प्रणाली बंद असल्याकारणाने टँकर वाहतूक धारकाने टँकरच्या फे-या झाल्याचा दावा केला असल्यास, अशा फे-या अनुज्ञेय ठरणार नाहीत. तसेच जी.पी.एस. प्रणालीची नोंद होत नाही म्हणून देयके प्रमाणित करण्यात येऊ नये व अशा प्रकारे प्रमाणित केलेल्या देयकांसाठी निधी वितरीत करण्यात येऊ नये**" या शासन निर्णयाद्वारे वगळण्यात येत आहे. सदर सूट केवळ विशेष बाब म्हणून ३५० व्या राज्यभिषेक सोहळयाकरिता किल्ले रायगड व पाचाड येथे उपलब्ध करून दिलेल्या टँकर्स करीताच मर्यादित राहील.

०२. **दिनांक २६.०३.२०२४ च्या शासऩ निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी दिनांक ३० जून, २०२४ पर्यंत खर्च करुन त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र, दिनांक २७ जुलै, २०२४ पूर्वी शासनास सादर करावे.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०५०६१८०८३९८०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUGANDHA DEEPAK PAWAR

Digitally signed by SUGANDHA DEEPAK PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=d4ecddac21f58159928daa9563eab5974 48bd1556ca3f9caa9101e05e9a13341, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7D94472B912CB3702FBA035D0 A51948B4F9C9AE9051C2DEE02FFCA4B1014CEA, cn=SUGANDHA DEEPAK PAWAR
Date: 2024.05.06 18:35:11 +05'30'

**(सुगंधा पवार)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा. उप मुख्यमंत्री ( गृह /वित्त), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२,
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

९. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई
१०. जिल्हाधिकारी, रायगड
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड
१२. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा जिल्हा परिषद, रायगड
१३. निवड नस्ती (पापु-१४).